महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन निर्णय क्र.लोसंधो-२०००/प्र.क्र.५७/००/कु.क.१
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ९ मे,२०००

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राज्य विविध क्षेत्रात नेहमीच आघाडीवर राहिले आहे. परंतु लोकसंख्या वाढीचा वेग अपेक्षेनुसार नियंत्रित झालेला नाही. १९०१ ते १९६१ या ६० वर्षात राज्याची लोकसंख्या दुप्पट झाली. परंतु १९६१ ची लोकसंख्या त्यापुढील ३० वर्षातच म्हणजे १९९१ पर्यंत दुप्पट झाली. या वेगाने वाढणा-या लोकसंख्येवर नियंत्रण आणण्यासाठी शासनामार्फत सातत्याने प्रयत्न करण्यात आले आहेत. राज्याची सामाजिक, भौगोलिक व औद्योगिक परिस्थिती पहाता या लोकसंख्या वाढीस विविध सामाजिक घटक जबाबदार आहेत. त्यामध्ये मुख्यत: मुलींचे कमी वयात लग्न, मुलगा हवा हा समाजात दृढ असलेला हव्यास या बाबींचा समावेश आहे.

२. "इंटरनॅशनल कॉन्फरन्स ऑन पॉप्युलेशन डेव्हलपमेंट"मध्ये पारीत केलेल्या ठरावानुसार देशात आता प्रजनन व बाल आरोग्य हा कार्यक्रम कार्यान्वित आहे. या कार्यक्रमांतर्गत लोकसंख्यावाढीवर नियंत्रण आणण्याबरोबरच माता बाल संगोपन, गरोदर मातेची काळजी, नवजात अर्भकाची काळजी, पौगंडा अवस्थेतील मुलींच्या आरोग्याची काळजी, प्रजननसंबंधीचे आजार इत्यादी महत्वाच्या घटकांवर लक्ष केंद्रीत केले जात आहे.

३. लोकसंख्या वाढीवर नियंत्रण आणण्यासाठी तसेच इंटरनॅशनल कॉन्फरन्स ऑन पॉप्युलेशन डेव्हलपमेंट मध्ये पारीत केलेल्या ठरावांच्या अनुषंगाने कुटुंब कल्याण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीत आमुलाग्र बदल झाल्यामुळे बदलत्या परिस्थितीचा विचार करुन राज्याचे सर्वकष लोकसंख्या धोरण ठरविणे आवश्यक झाले आहे. त्यानुसार राज्य लोकसंख्या धोरण पुढीलप्रमाणे जाहीर करण्यात येत आहे.

**या धोरणाची मुख्य उद्दिष्टे खालीलप्रमाणे आहेत :-**

अ) इ.स. २००४ पर्यंत जननदर २.५ वरुन २.१ वर आणणे.
ब) बालमृत्यू व मातामृत्यू प्रमाणात लक्षणीय घट घडवून आणणे.
क) कुटुंबाची सर्वांगीण आरोग्य स्थिती सुधारणे.
ड) छोटी गांवे, आदिवासी विभाग आणि शहरी भागातील झोपडपट्टया याकरिता विशेष सेवांची उपलब्धता.

६) विविध आरोग्य निर्देशकांमध्ये गाठावयाचे लक्ष्य :-

| | १९९८ | २००४ | २०१० |
|---|---|---|---|
| जन्मदर | २२.३ | १८ | १५ |
| मृत्यूदर | ७.६ | ६.४ | ५ |
| एकूण जननदर | २.५ | २.१ | १.८ |
| बालमृत्यूदर | ४९ | २५ | १५ |
| अर्भकमृत्यूदर | ३५ | २० | १० |

४. विहीत उद्दिष्ट गाठण्यासाठी राज्यात अस्तित्वात असलेल्या संस्था व त्यातील मनुष्यबळाचा सुयोग्य व पुरेपुर वापर करण्यावर भर देण्यात येणार असून यामध्ये प्रामुख्याने खालील बाबींचा समावेश आहे :-

१) कार्यक्रमाचे व्यवस्थापन सुधारणे (संनियंत्रण व पर्यवेक्षणात सुधारणा)
२) सेवांची उपलब्धता व गुणवत्ता सुधारणे.
३) उपलब्ध सेवांविषयी व सामाजिक समस्यांविषयी जनजागृती (वयाच्या अठरा वर्षानंतर मुलीचा विवाह करणे, मुलगा हवा असा हव्यास कमी करणे, आरोग्यासंबंधी अधिकारांची जाणिव, सुरक्षित प्रसुतीची गरज इ.)
४) किशोरवयीन मुला-मुलींसाठी आरोग्य विषयक सल्ला व सेवा
५) विविध क्षेत्रांचा व विभागांचा सहभाग.

प्रस्तावित उपाययोजना :-

या घटकामध्ये खालील बाबींचा समावेश करण्यात आला आहे :-

१) छोटे कुटुंब संकल्पनेचा स्वीकार -

दोन अपत्यांपर्यंतचे कुटुंब म्हणजेच "छोटे कुटुंब" या संकल्पनेचा स्वीकार करण्यात आला आहे.

२) वैयक्तीक लाभासाठी छोटे कुटुंब संकल्पनेचा स्वीकार आवश्यक :- (दि.१-५-२००१ पासून अंमलात येईल.)

अ) फक्त छोटे कुटुंब (२ जिवंत अपत्य) संकल्पना अवलंबिणाऱ्या जोडप्यांना यापुढे राज्य शासनाच्या विविध योजनांखाली मिळणाऱ्या सवलतींस पात्र समजण्यात येईल.

ब) शासकीय/निम शासकीय कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्ती मध्ये छोटया कुटुंब संकल्पनेचा समावेश केला जाईल

क) घरबांधणी अग्रीम, वाहन अग्रीम, इत्यादि सवलतींसाठी २ जिवंत अपत्यांपर्यंत कुटुंब मर्यादित ठेवणा-या शासकीय/निम शासकीय सेवकांना प्राधान्य दिले जाईल.

ड) वैद्यकीय देखभाल नियमानुसार मिळणा-या वैद्यकीय खर्चाच्या परिपूर्तीसाठी दोन जिवंत अपत्यापर्यंत कुटुंब मर्यादित ठेवणा-या शासकीय/निम शासकीय सेवकांना पात्र समजण्यात येईल.

३) **अधिका-यांच्या गोपनीय अहवालात त्यांच्या कार्यक्षेत्रात झालेल्या राज्य लोकसंख्या धोरणाच्या अंमलबजावणीचा उल्लेख :- (दि.१-४-२००० पासून अंमलात येईल.)**

या धोरणाची अंमलबजावणी विविध स्तरावरील अधिका-यांच्या सहकार्याने, संनियंत्रणाने करण्यात येणार असल्यामुळे विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषदा, आयुक्त महानगरपालिका, मुख्याधिकारी नगरपरिषदा, गट विकास अधिकारी पंचायत समित्या, तहसिलदार, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा शल्यचिकित्सक, उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ प्रमुख इत्यादिंच्या कार्यक्षेत्रात झालेल्या राज्य लोकसंख्या धोरणाच्या अंमलबजावणीचा उल्लेख त्यांच्या गोपनीय अभिलेखात स्वयंमूल्य निर्धारणाच्या प्रपत्रात "शासकीय अधिका-यास नेमून दिलेली कामाची उद्दिष्टे" या रकान्यात तसेच गोपनीय अहवालातील "सर्वसाधारण मूल्यमापन" या रकान्यात करण्यात येईल.

४) **आरोग्य सेवांच्या उपलब्धतेत वाढ - यामध्ये खालील बाबींचा समावेश करण्यात आलेला आहे :-**

अ) पदव्युत्तर प्रशिक्षणानंतर दोन वर्ष ग्रामीण सेवा.

ब) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नेमणूका व बदल्यांविषयीच्या धोरणाची काटेकोरपणे अंमलबजावणी.

क) बिनटाक्याच्या शस्त्रक्रियेसाठी आवश्यक सेवा व सुविधांचे बळकटीकरण करणे.

ड) दुर्गम भागात आकस्मिक परिस्थितीत रुग्णांची ने-आण करण्यासाठी वाहनाची योग्य सोय उपलब्ध नसल्यामुळे योग्य वेळेत आरोग्य सेवा व सुविधा उपलब्ध करण्यास अडचणी येतात. अशावेळी दुर्गम भागात संदर्भ सेवा केंद्रात उपचाराकरिता जाणे सोईस्कर व्हावे याकरिता मातृ सुरक्षा वाहिनी योजना कार्यान्वित केली जाईल.

५) **विविध संस्थांमार्फत कुटुंब कल्याण शिबीराचे आयोजन :-**

साखर कारखाने, सहकारी संस्था, जिल्हा मध्यवर्ती बँका, दूध उत्पादक संघ व संस्था, सूत गिरण्या, औद्योगिक आस्थापना, खाजगी वैद्यकीय व्यावसायिक, इंडियन मेडिकल असोशिएशन, नॅशनल इंटिग्रेटेड मेडिकल असोशिएशन, रोटरी, लायन्स इत्यादि सामाजिक संस्था यांच्या आर्थिक सहाय्याने कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत माता बाल संगोपन,आर.टी.आय./एस.टी.डी. निदान, निर्बीजीकरण शस्त्रक्रिया इत्यादि करिता शिबीरे आयोजित करण्यात येतील.

## ६) सध्या अस्तित्वात असलेल्या खालील कायदयांची व धोरणांची कडक अंमलबजावणी केली जाईल :-

यामध्ये प्रामुख्याने खालील कायदा/धोरणाचा समावेश करण्यात आला आहे :-

अ) बाल विवाह प्रतिबंधक कायदा १९७८

ब) मुलींसाठी मोफत शिक्षण

क) महिला धोरण

ड) प्रसुती पूर्व निदान तंत्र अधिनियम १९९४

इ) जन्म-मृत्यू नोंदणी अधिनियम १९६९

ई) महाराष्ट्र विवाह मंडळाचे विनियमन आणि विवाह नोंदणी अधिनियम १९९८

## ७) निवडणुकीसाठी पात्रता ठरवितांना छोटे कुटुंब संकल्पनेची अट (दिनांक १-५-२००१ पासून अंमलात येईल):-

"छोटे कुटुंब" या संकल्पनेबाबत जनजागृती निर्माण होण्यासाठी जिल्हा परिषदा, पंचायत समित्या, महानगरपालिका इत्यादि शासकीय संस्था/समित्यांवरील पदाधिकाऱ्यांचा जनतेसमोर आदर्श निर्माण होणे आवश्यक आहे. यासाठी जिल्हा परिषदा, पंचायत समिती, महानगरपालिका, महामंडळ, सहकारी संस्था, जिल्हा मध्यवर्ती बँका, दूध उत्पादक संघ व संस्था, सूत गिरण्या त्याचप्रमाणे विविध शासकीय समित्यांवर निवडीसाठी/नियुक्तीसाठी छोटे कुटुंब (दोन जिवंत अपत्य)असणाऱ्या व्यक्तींना पात्र समजण्याबाबत निवडणूक विषयक संबंधीत नियमात तरतूद करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

## ८) जागरुक ग्रामपंचायत योजना (दि.१-५-२००१ पासून अंमलात येईल):-

धोरणाच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी जनतेचा तसेच ग्रामपंचायत स्तरावरील लोकप्रतिनिधींचा सहभाग वाढविण्याच्या उद्देशाने जिल्हा स्तरावर "जागरुक ग्रामपंचायत योजना" कार्यान्वित केली जाईल. या अंतर्गत विशिष्ट निकष पूर्ण करणाऱ्या ग्रामपंचायतींना स्थानिक गरजांच्या आधारे उदा. पाण्याची कमतरता असल्यास विहीर खोदणे, बोअरवेल उपलब्ध करणे, सार्वजनिक संडास बांधणे, ग्रामपंचायत/शाळेच्या इमारतीची दुरुस्ती करणे, रस्ते सपाटीकरण करणे इत्यादि महत्वाच्या कामासाठी निधी उपलब्ध केला जाईल. ही योजना १-५-२००१ पासून लागू करण्यात येईल.

## ९) सेवेची गुणवत्ता वाढविण्यासाठी (दि.१-४-२००० पासून अंमलात येईल) :-

अ) राज्य लोकसंख्या धोरणाच्या यशस्वी अंमलबजावणीकरिता विविध क्षेत्रांवर भर दिला जात आहे. यामध्ये आरोग्य सेवा व सुविधांचे बळकटीकरण करणे इत्यादि वर ही भर दिला जाणार आहे. विविध स्तरावर उत्कृष्ट कार्य करणाऱ्या उदा. परिसर स्वच्छता, रुग्णांना योग्य वागणूक इत्यादि निकष पूर्ण करणाऱ्या शासकीय आरोग्य संस्थांना विविध स्तरावर पारितोषिक योजना-

१) राज्य स्तरावर उत्कृष्ट जिल्हा रुग्णालय व स्त्री रुग्णालय.
२) मंडळ स्तरावर उत्कृष्ट ग्रामीण रुग्णालय
३) जिल्हा स्तरावर उत्कृष्ट प्राथमिक आरोग्य केंद्र व उत्कृष्ट उपकेंद्र

ब) **प्रथम संदर्भ सेवा संस्थेत काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना पारितोषिक योजना-** राज्य शासनाच्या विविध योजनांतर्गत आरोग्य सेवा व सुविधांचे बळकटीकरण केले जात आहे. त्या अनुषंगाने ग्रामीण, दुर्गम व आदिवासी क्षेत्रातील जनतेला तज्ञांमार्फत विशिष्ट आरोग्य सेवा उपलब्ध व्हावी याकरिता राज्यात प्रथम सेवा संदर्भ केंद्र स्थापन करण्यात आली आहेत. या संस्थांच्या कामाचे स्वरुप लक्षात घेता या संस्थेत उत्कृष्ट काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना विशेष प्रोत्साहन देण्यासाठी पारितोषिक योजना जाहिर करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत राज्य स्तरावर ३ कर्मचाऱ्यांना पारितोषिके देण्यात येतील.

वरीलप्रमाणे पारितोषिक विजेत्या संस्थेस/कर्मचाऱ्यास फिरती ढाल व प्रमाणपत्र देण्यात येईल.

१०) **प्रसुती सुविधांचे बळकटीकरण** -

ग्रामीण भागात अप्रशिक्षित दाईकडून प्रसुती करुन घेण्याची प्रथा लक्षात घेता सदर प्रसुती सुरक्षित होण्यासाठी तसेच माता व बालमृत्यू कमी करण्यासाठी गावपातळीवर अप्रशिक्षित दाईंना प्राथमिक आरोग्य केंद्रात दाईचे प्रशिक्षण दिले जाईल.

११) **नागरी भागात आरोग्य सेवेचा दर्जा व गुणवत्ता वाढविण्यासाठी विशेष उपाययोजना** :-

या योजनेंतर्गत महानगरपालिका, नगरपालिका क्षेत्रात महिलांचा, पौगंडा अवस्थेतील मुलींच्या आरोग्याचा दर्जा वाढविण्यासाठी नियमितपणे आरटीआय/एसटीडी इत्यादीचे निदान व उपचार करण्याकरिता रोगनिदान शिबीरे आयोजित करण्यात येतील व आवश्यक त्या रुग्णांवर उपचार करण्यात येतील.

१२) **ग्रामीण पातळीवर माता बाल संगोपन सेवा केंद्रे** -

ज्या गावामध्ये उपकेंद्रे, प्राथमिक आरोग्य केंद्रांचे मुख्यालय नाही त्या गावात निर्जंतुक व स्वच्छ वातावरणातील प्रसुती सेवा, माता बाल संगोपन सत्रे,इत्यादि आयोजित करण्याकरिता माता बाल संगोपन सेवा केंद्राची स्थापना केली जाईल.

१३) **सुधारित सावित्रीबाई फुले कन्या कल्याण योजना**
( दि.१-४-२००० पासुन लागू करण्यात येत आहे).

१) ही योजना केवळ दारिद्र्य रेषेखालील कुटुंबांकरिता लागू करण्यात येत आहे.
२) एखादया विवाहीत जोडप्याने वयाची ४० वर्ष पूर्ण होण्यापूर्वी एकच अपत्य (मुलगी) असतांना कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केल्यास त्या

मुलीच्या नांवे रु.१०,००० रकमेची मुदत ठेव उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर रक्कम त्या मुलीस तिच्या वयाच्या १८ व्या वर्षी देय होईल. तसेच ती मुलगी इ.१० वी उत्तीर्ण झाल्यानंतर तिच्या नांवे आणखी रु.५,०००/- रकमेची मुदत ठेव पाच वर्षाच्या कालावधीसाठी दिली जाईल व ही रक्कम तिचे लग्न वयाच्या वीस वर्षापूर्वी न झाल्यास तिला देय होईल.

३) एखादया विवाहीत जोडप्याने वयाची ४० वर्ष पूर्ण होण्यापूर्वी दोन मुलींच्या जन्मानंतर (मुलगा नसताना) कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया करुन घेतली असेल तर त्या दोन्ही मुलींच्या नांवे प्रत्येकी रु.५,०००/- रकमेची मुदत ठेव उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर रक्कम त्या मुलींना त्यांच्या वयाच्या अठराव्या वर्षी उपलब्ध करुन देण्यात येईल. या मुलींनी इयत्ता १० वी उत्तीर्ण केल्यानंतर त्यांच्या नांवे प्रत्येकी रु.५,०००/- रक्कमेची मुदत ठेव पाच वर्षाच्या कालावधीसाठी उपलब्ध करुन देण्यात येईल. ही रक्कम त्यांचे लग्न वयाच्या २० वर्षापूर्वी न झाल्यास त्यांना देय होईल.

## १४) राज्य लोकसंख्या महिला परिषद-

धोरणाच्या अंमलबजावणीसाठी राज्य स्तरापासून ते गावपातळीपर्यंत महिलांचा सक्रीय सहभाग मिळविणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने राज्य स्तरावर महिलांचा समावेश असलेली राज्य लोकसंख्या परिषद स्थापन केली जाणार आहे.

राज्य स्तरावर - मा.मुख्यमंत्री यांच्या पत्नीच्या अध्यक्षतेखाली राज्य लोकसंख्या महिला परिषद स्थापन करण्यात येईल.

## १५) लोकसंख्या धोरणाचे संनियंत्रण व यशस्वी अंमलबजावणी करिता राज्यस्तर, विभागीयस्तर व जिल्हास्तरावर लोकसंख्या परिषद/समितीची स्थापना :-

अ) १) राज्य स्तरावर मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली राज्य लोकसंख्या परिषदेची स्थापना.

२) मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली राज्य संनियंत्रण समितीची स्थापना.

ब) विभागीय स्तरावर महसूल आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय लोकसंख्या समन्वय समितीची स्थापना.

क) जिल्हा स्तरावर मा.पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा लोकसंख्या समन्वय परिषदेची स्थापना.

ड) जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा लोकसंख्या समन्वय समितीची स्थापना.

५. या आदेशातील संबंधीत योजना त्या समोर दर्शविलेल्या दिनांकापासून अंमलात येतील.

६. सदर लोकसंख्या धोरणात सुचविण्यात आलेल्या उपाययोजनांच्या अंमलबजावणीसाठी यासंबंधीच्या नियमात सुधारणा अथवा स्वतंत्र सविस्तर आदेश संबंधीत विभागामार्फत निर्गमित करण्यात येतील. या आदेशात संबंधीत योजनेच्या अटी व शर्ती सविस्तरपणे नमूद करण्यात येतील. या अटी व शर्तींच्या आधारे यावर अंमलबजावणीची कार्यवाही करण्यात येईल.

७. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सुधीर श्रीवास्तव)
सचिव (कुटुंब कल्याण)

प्रति
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री
सर्व राज्यमंत्री
सर्व विधान सभा सदस्य.
सर्व विधान परिषद सदस्य.
मुख्य सचिव, महाराष्ट्र
मुख्य सचिवांचे सहसचिव
सर्व विभागाचे सचिव
सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, निर्माण भवन, नवी दिल्ली.
सर्व विभागीय आयुक्त
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
सर्व नगरपालिकांचे प्रशासक
सर्व जिल्हा अधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
संचालक, आरोग्य सेवा
अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण), पुणे.
सहसंचालक, आरोग्य सेवा (आय.इ.सी.), पुणे.
सहसंचालक व प्रकल्प समन्वयक, आरोग्य सेवा, पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा, मंडळ प्रमुख.
सर्व जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रुग्णालय
सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी
सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी,
सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, कु.क.१

---x---